**नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवर अनुकंपा तत्वावर नियुक्तीकरीता गट 'ड' ची अधिसंख्य पदे निर्माण करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: नमुंम-१२२२/सं.क्र.१८६०/प्र.क्र. ०८/नवि-२८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २८ एप्रिल, २०२५

**वाचा** : १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. नमुंम-१२१९/प्र.क्र.१३७/नवि-२८, दि.३०.०३.२०२१.
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. नमुंम-१२१५/प्र.क्र.१६/१५/नवि-२८, दि.२१.०८.२०१७.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. अकंपा-१२१९/प्र.क्र.५३/आठ, दि.११.०९.२०१९.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. अकंपा-१२२२/प्र.क्र.९६/आठ, दि.१९.०९.२०२२.
५) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र.नमुंमपा/प्रशा/आस्था-१/प्र.क्र.५१४/४४६३/२०२१, दि.२२.१२.२०२१
६) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र. नमुंमपा/प्रशा/आस्था-१/प्र.क्र.५१४/६७८/२०२२, दि.०८.०३.२०२२.
७) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र. नमुंमपा/प्रशा/आस्था-१/प्र.क्र.५१४/१४१३/२०२२, दि.१७.०५.२०२२.
८) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र. नमुंमपा/प्रशा/आस्था-१/प्र.क्र.५१४/३४२८/२०२२, दि.०१.१२.२०२२.
९) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र. नमुंमपा/प्रशा/आस्था-१/प्र.क्र.५१४/२९२६/२०२३, दि.२९.०८.२०२३.
१०) नवी मुंबई महानगरपालिका प्रशासकीय ठराव क्र. ४९१५, दि.१७.०८.२०२३.

**प्रस्तावना**: -

नवी मुंबई महानगरपालिका आकृतीबंधास दि.२१.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर आकृतीबंधात गट-ड मधील शिपाई या संवर्गासह इतर काही पदे कार्यरत कर्मचारी निहाय व्यपगत करण्यात आली आहेत. तद्नंतर नवी मुंबई महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१ या नियमास दि.३०.०३.२०२१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. सदर सेवा प्रवेश नियमातील परिशिष्ट-(१) मधील अ.क्र. ९ मध्ये "गट-क व गट-ड" मधील अनुकंपाच्या भरावयाच्या पदांसाठी आयुक्तांच्या शिफारशीने व शासन मान्यतेने अधिसंख्य पदे निर्माण करता येतील, अशी तरतूद आहे. त्यानुसार नवी मुंबई महानगरपालिका आस्थापनेवर 'शिपाई' पदाच्या प्रतिक्षासूचीतील उमेदवारांना 'शिपाई' या पदावर अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देणेकरीता गट-ड ची २३ अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत सेवा प्रवेश नियमातील तरतूदीनुसार उक्त प्रस्ताव संदर्भाधीन पत्रान्वये शासनास सादर केला आहे. तसेच, उक्त प्रस्तावान्वये, प्रतिक्षासूचीत समाविष्ट नसलेली, श्रीमती सुनिता जगदीश घरत यांनात्यांचे दिवंगत पती जगदीश मारूती घरत यांचे जागेवर अनुकंपा तत्वावर नियुक्ती मिळणेकरीता त्यांच्या वयाची अट शिथील करण्यास व श्रीमती मेघा चंद्रकांत नलावडे यांना त्यांचे दिवंगत वडील चंद्रकांत रघुनाथ नलावडे यांचे जागेवर अनुकंपा तत्वावर नियुक्ती मिळण्याच्या अनुषंगाने अर्ज सादर करणेकरिता झालेला विलंब क्षमापित करण्याची विनंती केली आहे.

**२.** त्याअनुषंगाने नवी मुंबई महानगरपालिका आस्थापनेवर 'शिपाई' पदाच्या प्रतिक्षासूचीतील उमेदवारांना 'शिपाई' या पदावर अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देणेकरीता गट-ड ची २३ अधिसंख्य पदे निर्माण करण्यास, शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>: -**

आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचेकडून संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेले प्रस्ताव, नवी मुंबई महानगरपालिका सेवा प्रवेश नियमातील तरतूदीनुसार प्रशासकीय ठराव क्र. ४९१५, दि.१७.०८.२०२३ द्वारे दिलेली मान्यता तसेच, संदर्भाधीन सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयातील तरतूदी पाहता, नवी मुंबई महानगरपालिका आस्थापनेवर विवरणपत्र 'अ' मधील 'शिपाई' पदाच्या प्रतिक्षासूचीतील उमेदवारांना 'शिपाई' या पदावर अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देणेकरीता गट ,अधिसंख्य पदे निर्माण करण्यास २३ ड ची-पुढील अटी व शर्तीनुसार शासन मान्यता देण्यात येत आहे:-

***<u>अटी व शर्ती :-</u>***

१) नवी मुंबई महानगरपालिका आस्थापनेवर 'शिपाई' पदाच्या प्रतिक्षासूचीतील उमेदवारांना 'शिपाई' पदावर अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देणेकरीता निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदांवर शासन निर्णयाच्या दिनांकापासून नियुक्ती देण्यात यावी.

२) या कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावरील पदस्थापनेच्या दिनांकापासून कायम सेवेचे तद्नुषंगिक लाभ (वेतन, सेवा जेष्ठता, निवृत्तीवेतन इत्यादी) देय राहतील.

३) सदर कर्मचाऱ्यांच्या वेतनाकरीता कोणताही निधी शासनाकडून उपलब्ध करून दिला जाणार नाही.

४) अनुकंपा प्रतिक्षासूचीतील उमेदवारांव्यतिरिक्त अन्य कोणाचीही नियुक्ती, सदर अधिसंख्य पदावर करता येणार नाही.

५) सदरचे अधिसंख्य पद कोणत्याही कारणास्तव रिक्त झाल्यास ते त्या दिनांकापासून आपोआप व्यपगत होईल.

६) सदर कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावर नियुक्ती देतांना त्यांची वेतनश्रेणी त्या पदाच्या समकक्ष वेतनश्रेणीपेक्षा जास्त असणार नाही, याची आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी दक्षता घ्यावी.

७) सदर कर्मचाऱ्यांना एकवेळची बाब म्हणून नियमित करण्यासाठी निर्माण करण्यात आलेली अधिसंख्य पदे त्यांच्या सेवानिवृत्तीनंतर अथवा इतर कारणास्तव रिक्त झाल्यास आपोआप व्यपगत होत असल्याने, त्यांच्या वारसदारांना नियुक्ती देण्यासाठी कोणतेही अधिसंख्य पद निर्माण करण्यात येणार नाही अथवा व्यपगत झालेले पद पुर्नजिवीत करता येणार नाही.

८) श्रीमती सुनिता जगदीश घरत यांना त्यांचे दिवंगत पती जगदीश मारूती घरत यांचे जागेवर अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्याच्या अनुषंगाने त्यांचे वय सेवा भरती नियमांमध्ये नमूद केलेल्या वयोमर्यादे पेक्षा जास्त असल्याने त्यांच्या प्रकरणी वयाची अट शिथील करणेस मंजूरी देण्यात येत आहे. (अनुकंपा धोरणातील प्रचलित तरतूदीनुसार पात्र अपात्रतेबाबत महानगरपालिकेने खातरजमा करण्याच्या अधीन)

९) श्रीमती मेघा चंद्रकांत नलावडे यांचे त्यांचे दिवंगत वडील चंद्रकांत रघुनाथ नलावडे यांचे जागेवर अनुकंपा तत्वावर नियुक्ती मिळणेकरीता विनंती अर्ज सादर करण्यास झालेला विलंब क्षमापित करण्यात येत आहे. (अनुकंपा धोरणातील प्रचलित तरतूदीनुसार पात्र अपात्रतेबाबत महानगरपालिकेने खातरजमा करण्याच्या अधीन)

**२.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२५०४२८१७५२३२२१२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUSHILA
DHONDIRAM PAWAR

Digitally signed by SUSHILA DHONDIRAM PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=be0660f27b88fa30c14d66b8296a2c28478562c6fd9d1d360094fe11409501d5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D78E8AB53FB3619E69D852CE1492593ABC1DCE1DF4E081AFE790194FB65C97B, cn=SUSHILA DHONDIRAM PAWAR
Date: 2025.04.28 18:10:45 +05'30'

**( सुशिला पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) महोदयांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) आयुक्त तथा प्रशासक, नवी मुंबई महानगरपालिका, जि.ठाणे.
३) प्रधान सचिव (नवि २), यांचे विशेष कार्यअधिकारी/स्वीय सहायक, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
४) उप सचिव (नवि-२८), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
५) निवडनस्ती (नवि-२८)

**शा.नि.क्र. नमुंम-१२२२/सं.क्र.१८६०/प्र. क्र. ०८/नवि-२८, दि. २८ एप्रिल, २०२५ सोबतचे**

**“विवरणपत्र-अ”**

| अ. क्र. | कर्मचाऱ्याचे नाव |
|---|---|
| १ | श्री. विशाल सुरेश साळुंखे |
| २ | श्रीमती सुगंधा भरत तातळे |
| ३ | श्री. उमेश विठ्ठल मस्तुद |
| ४ | श्री. प्रशांत जयप्रकाश सुर्वे |
| ५ | श्री. आकाश प्रदिप पाटील |
| ६ | श्री. कृष्णदेव बसाप्पा हजारे |
| ७ | श्रीमती सुषमा लवू पेडणेकर |
| ८ | श्री. सलमान मुस्तफा पिंजारी |
| ९ | श्री. आकाश प्रेमनाथ निकम |
| १० | श्री. वृषांक आदेश चव्हाण |
| ११ | श्री. ज्ञानदेव राजेंद्र भवारी |
| १२ | श्री. सौरव उत्तम चव्हाण |
| १३ | श्री. आकाश संतोष बाकळे |
| १४ | श्री. रोनित संतोष नाईक |
| १५ | श्रीमती सुनिता ज्ञानेश्वर पवार |
| १६ | श्री. हर्षल विनायक ठोंबरे |
| १७ | श्रीमती कोमल अरविंद हिवाळे |
| १८ | श्रीमती मंगला सुरेंद्रसिंग राठोड |
| १९ | श्री. हेमंत विष्णु गावित |
| २० | श्रीमती शुभांगी विनायक पवार |
| २१ | श्रीमती मानसी  गणेश सपकाळ |
| २२ | श्रीमती सुनिता जगदीश घरत, |
| २३ | श्रीमती मेघा चंद्रकांत नलावडे |

**********

SUSHILA
DHONDIRAM
PAWAR